**"बँक ऑफ बडोदाची e pay ही सेवा वापरण्यास व त्यांचेसोबत करावयाच्या सामंजस्य करारावर सह्या करण्यास जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्याबाबत.........."**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राभूअ-२०२०/प्र.क्र.१३७/ल-१**
पहिला मजला, मुख्य इमारत, मंत्रालय,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.
दिनांक : ३१ ऑगस्ट, २०२०

**वाचा:-**

१. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०१९/प्र.क्र.३६६/ल-१, दि.२७.०२.२०२०

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यात DILRMP अंतर्गत संगणकीकृत केलेले अधिकार अभिलेख डिजीटल स्वाक्षरीत गा.न.नं.७/१२, गा.न.नं.८अ, फेरफार उतारा, इत्यादी या सारख्या ऑनलाईन अधिकार अभिलेख/नकाशाची नक्कल वितरणातून प्राप्त होणाऱ्या निधीची रक्कम स्विकारण्यासाठी जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना व्हर्च्यअल अकाउंटसह बॅक आफ बडोदा मध्ये जमा खाते (DEPOSIARY ACCOUNT) उघडण्यास वाचा क्रमांक १ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. अधिकार अभिलेख/नकाशांची संगणकिकृत नकलांच्या वितरणानंतर जमा होणाऱ्या शुल्काची रक्कम ऑनलाईन स्किारण्यासाठी बँक ऑफ बडोदाची e Pay सेवा वापरण्याची व सदर e Pay सेवा वापरण्याची बँक ऑफ बडोदासोबत सामंजस्य करार करणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने बँक ऑफ बडोदाची e Pay सेवा वापरण्यास व त्यांचेसोबत करावयाच्या सामंजस्य करारावर शासनातर्फे सह्या करण्यास "जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे" यांना प्राधिकृत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

अधिकार अभिलेख/नकाशांची संगणकिकृत नकलांच्या वितरणातून प्राप्त होणाऱ्या निधीची रक्कम स्विकारण्यासाठी जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना व्हर्च्यअल अकाउंटसह बॅक आफ बडोदा मध्ये जमा खाते (DEPOSIARY ACCOUNT) उघडण्यास वाचा क्रमांक १ अन्वये उघण्यात आलेल्या जमा खाते मध्ये वितरणानंतर जमा होणाऱ्या शुल्काची रक्कम ऑनलाईन स्किारण्यासाठी बँक ऑफ बडोदाची e Pay सेवा वापरण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर e Pay सेवा वापरण्याची बँक ऑफ बडोदासोबत सामंजस्य करार करणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने बँक ऑफ बडोदासोबत करावयाच्या सामंजस्य करारावर शासनातर्फे सह्या करण्यास "जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे" यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. सदर e Pay सेवा वापरण्यासाठी बँक ऑफ बडोदासोबत सामंजस्य करार करण्यापूर्वी त्यांच्या सोबत करण्यात येणाऱ्या कराराच्या प्रारूपास मान्यता घेणे "जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे" यांना बंधन कारक राहील.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाचया अनौपचारिक संदर्भ क्र.१६३/२०/कोष-प्रशा-५, दिनां.१०.०७.२०२० अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८३११६१०३७३०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANTOSH
HARIDASRAO
BHOGLE

Digitally signed by SANTOSH HARIDASRAO BHOGLE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra,
ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=cfe36679ae12922422bc5e7f7d277841f1fe677
25f465c272fd6727259260b3d, cn=SANTOSH
HARIDASRAO BHOGLE
Date: 2020.08.31 16:13:20 +05'30'

**(डॉ.संतोष भोगले)**
सह सचिव

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव.
४. सर्व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
५. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव.
६. अपर मुख्य सचिव (वित्त) / प्रधान सचिव (माहिती तंत्रज्ञान)
७. सर्व विभागीय आयुक्त
८. जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख, पुणे
९. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०. सर्व जिल्हाधिकारी
११. महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र १ व २, मुंबई / नागपूर
१२. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र १ व २, मुंबई / नागपूर
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१४. माहिती तंत्रज्ञान संचालनालय, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१६. निवड नस्ती